कृषि आयुक्तालयांतर्गत क्षेत्रीय कार्यालयातील निरुपयोगी अथवा अतिरिक्त साहित्य/यंत्रसामुग्री, वाहने व इतर यंत्रसामग्री इत्यादी साहित्याचा लिलाव करण्यासाठी राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC) यांनी विकसित केलेली ई-लिलाव आज्ञावलीचा वापर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक : कृषिआ १७२०/प्र.क्र.१५७/१६अे**
**मंत्रालय विस्तार इमारत,**
**मंत्रालय, मुंबई - ३२.**
**तारीख : २८ ऑगस्ट, २०२०**

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय क्रमांक : मातंस०८०/६/२०१३-DIR-DIT(MH)/३९, दि. ०३ डिसेंबर, २०१४

२) संचालक (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तलय, पुणे यांचे पत्र क्र.एमसीएस/३४९१/प्र.क्र.४०२९/भाग-९/मृद-७/८७६७/१९, दि.०३.०३.२०२०

**<u>प्रस्तावना:-</u>**

कृषि आयुक्तालयांतर्गत राज्यातील क्षेत्रीय कार्यालयातील निरुपयोगी अतिरिक्त निर्लेखित साहित्य/यंत्रसामुग्री, वाहने, जुने सुटे भाग, टायर टयूब, बॅटरी, जुने मोडके फर्निचर, शेती औजारे व यंत्रसामग्री इत्यादी साहित्य ई-लिलाव प्रक्रियेद्वारे लिलाव करण्यासाठी मान्यता देण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने केलेली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०३.१२.२०१४ च्या शासन निर्णयानुसार ई-लिलाव पध्दतीमुळे संपूर्ण लिलाव प्रक्रियेमध्ये पारदर्शकता येऊन शासकीय महसुलामध्ये मोठया प्रमाणात वाढ झालेली असल्याचे सा.प्र.वि. च्या उपरोक्त शासन निर्णयात नमुद करण्यात आलेले आहे. राज्यातील सर्व संसाधनांच्या लिलावामध्ये पारदर्शकता, सुटसुटीतपणा, आणून व निकोप स्पर्धेला वाव देऊन शासकीय महसुलात वाढ व जास्तीत जास्त भौगोलिक क्षेत्रातील व्यापाऱ्यांपर्यंत पोचण्याच्या दृष्टीने ई-लिलाव पध्दतीचा वापर शासनाचे सर्व विभाग, कार्यालये, ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था, सार्वजनिक उपक्रम आणि महामंडळे यांना बंधनकारक करण्यात आलेले आहे. अनुषंगाने शासनाने आता पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

१. कृषि आयुक्तालयांतर्गत राज्यातील क्षेत्रीय कार्यालयातील निरुपयोगी अतिरिक्त निर्लेखित साहित्य/यंत्रसामुग्री वाहने, जुने सुटे भाग, टायर टयुब, बॅटरी, जुने मोडके फर्निचर, शेती औजारे व यंत्रसामग्री इत्यादी साहित्य ई-लिलाव प्रक्रियेद्वारे लिलाव करण्यासाठी राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC) यांनी विकसित केलेले ई-लिलाव आज्ञावली या संगणक प्रणालीचा वापर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कृषि आयुक्तालय व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयातील ई-लिलाव प्रणालीची कार्यवाही पार पाडण्यासाठी संचालक (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नोडल अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी यासंदर्भातील आवश्यक ती कार्यवाही क्षेत्रीय कार्यालयांशी समन्वय साधून करावी.

३. राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC) यांनी विकसित केलेल्या ई-लिलाव आज्ञावलीचा वापर करण्यात यावा. तसेच ई-लिलावाबाबत तांत्रिक सहाय्यासाठी राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC) कडून आवश्यकतेनुसार प्रशिक्षण घेण्यात यावे.

४. शासन परिपत्रक क्रमांक कृषिआ-१२०४/१७९०६/प्र.क्र.३७०/१६-ए, दि. २४.०५.२००५ अन्वये निर्लेखित साहित्य/यंत्रसामुग्री वाहने, जुने सुटे भाग, टायर टयुब, बॅटरी, जुने मोडके फर्निचर, शेती औजारे व यंत्रसामग्री इत्यादींची तपासणी करुन हातची किंमत (Up-set Price) ठरविण्यासाठी, तसेच प्रत्यक्ष लिलाव करण्यासाठी विभागस्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) विभागीय कृषि सहसंचालक - अध्यक्ष
२) अधिक्षक कृषि अधिकारी (विकृससं कार्यालय) - सदस्य
३) लेखाधिकारी (विकृससं कार्यालय) - सदस्य
४) कृषि अभियंता (विकृससं कार्यालय अथवा जवळच्या विकृससं कार्यालयातील) - सदस्य सचिव

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०३१२३५५७०९०१ असा आहे. हा संदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.09.03 12:37:34 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती) सोबत अर्जदारांची यादी जोडली आहे.
२. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (कृषि) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) १/२,महाराष्ट्र मुंबई/नागपूर

६. संचालक (लेखा कोषागारे), मुंबई-३२

७. संचालक (मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन), कृषि आयुक्तालय, पुणे

८. संबंधित विभागीय कृषि सहसंचालक/जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (द्वारा आयुक्त (कृषि),पुणे)

९. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे

१०.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा आयुक्त (कृषि), पुणे)

११.निवड नस्ती/१६ अे